**अनुसुचित जमाती प्रवर्गातील कर्मचाऱ्यांच्या सेवाविषयक तक्रारीचे निवारण करण्यासाठी "अंतर्गत तक्रार निवारण समिती" स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र : संकीर्ण - २०२१/प्र.क्र.२४८/२०२१/आ(वर्ग-२)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०४/०४/२०२२

**प्रस्तावना** :-

भारतीय राज्यघटनेच्या कलम ३३८ अ अंतर्गत अनुसुचित जमातीला प्रदान केलेल्या सुरक्षेशी संबंधित सर्व बाबींची तपासणी आणि निरीक्षण करण्यासाठी दि.१९/०४/२००४ रोजी राष्ट्रीय अनुसुचित जमाती आयोगाची स्थापना करण्यात आली आहे. सदर समितीकडे अनुसुचित जमातीच्या शासकीय कर्मचाऱ्यांच्या सेवा विषय बाबींच्या अनुषंगाने तक्रारी प्राप्त होत आहेत.

त्याअनुषंगाने राष्ट्रीय अनुसुचित जमाती आयोगाने अनुसूचित जमातीच्या कर्मचाऱ्यांच्या रोजगार / सेवेशी संबंधित तक्रारींचे निवारण करण्यासाठी " अंतर्गत तक्रार निवारण समिती " स्थापन करण्याबाबत सुचित केले आहे. त्यानुसार जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय कार्यालयातील अनुसुचित जमातीच्या अधिकारी / कर्मचारी यांच्या तक्रारींचे निवारण करण्यासाठी "अंतर्गत तक्रार निवारण समिती " समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जलसंपदा विभागातील तसेच शासनाच्या प्रत्यक्ष प्रशासकिय नियंत्रणाखालील कार्यालयातील अनुसूचित जमातीच्या अधिकारी / कर्मचारी यांच्या सेवाविषयक बाबींच्या तक्रारीचे निवारण करण्यासाठी खालील प्रमाणे " अंतर्गत तक्रार निवारण समिती" स्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | समितीची रचना |
|---|---|---|
| १ | अध्यक्ष | सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई |
| २ | सदस्य | सचिव / सह सचिव आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई |
| ३ | सदस्य | सह सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई |
| ४ | सदस्य | उप सचिव (प्रशा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई |
| ५ | सदस्य | अनुसुचित जमाती प्रवर्गातील उप सचिव / अवर सचिव , जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई |

तसेच क्षेत्रिय स्तरावरील महासंचालक / कार्यकारी संचालक यांच्या अधिनस्त कार्यालयासाठी पुढील प्रमाणे समिती स्थापन करण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **पदनाम** | **समितीची रचना** |
|---|---|---|
| १ | अध्यक्ष | महासंचालक मेरी /कार्यकारी संचालक पाटबंधारे महामंडळ |
| २ | सदस्य | आयुक्त आदिवासी विकास यांचे कार्यालयातील प्रतिनिधी |
| ३ | सदस्य | मुख्य अभियंता (संबंधित) |
| ४ | सदस्य | अधीक्षक अभियंता (संबंधित) |
| ५ | सदस्य | अधीक्षक अभियंता / कार्यकारी अभियंता अनुसुचित जमाती प्रवर्गातील महिला अधिकारी यांना प्रथम प्राधान्य देण्यात यावे. महिला अधिकारी उपलब्ध नसल्यास अनुसुचित जमाती प्रवर्गातील अन्य अधिकाऱ्यांची नियुक्ती करावी. |

२. उपरोक्त दोन्ही तक्रार निवारण समितींनी अनुसुचित जमातीच्या अधिकारी / कर्मचारी यांच्या सेवाविषयक बाबीच्या अनुषंगाने जसे की, बिंदू नामावलीतील पदे जात प्रवर्ग निहाय न भरल्यास, पदोन्नती, ज्येष्ठतासुचीतील भेदभाव, सेवा समाप्त / बडतर्फ, बदली /पदस्थापनेतील भेदभाव, पेन्शन लाभापासून वंचित ठेवणे इ. तक्रारीच्या अनुषंगाने प्राप्त तक्रारींचे तात्काळ निवारण करण्याची कार्यवाही समिती करील.

उपरोक्त सेवाविषयक बाबीच्या अनुषंगाने प्राप्त तक्रारीच्या अनुषंगाने समिती निवारण करुन केलेल्या कार्यवाहीची माहिती दर तीन महिन्यानी शासनास सादर करेल.

३. तसेच क्षेत्रिय स्तरावरील समितीकडून तक्रारींच्या अनुषंगाने प्राप्त माहितीच्या अनुषंगाने जलसंपदा विभागातील संबंधित कार्यासन कार्यवाही करुन आपला अहवाल मंत्रालय स्तरावरील "अंतर्गत तक्रार निवारण समितीस" सादर करील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२२०४०४१७१९४६२५२७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

UDDHAV R DAHIPHALE

Digitally signed by UDDHAV R DAHIPHALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=05b3ca49b9a0a924fd4d8743e6e254e742308f0210852798 6e098afc27201f30, pseudonym=DDF7D61D2ADB9D0A26CF5E52D408A84E1CEB62A8, serialNumber=2D80774C9ED65ECA9BE69006934BFB5C4CA32AB0D C1A2EC5746398458BDF1C37, cn=UDDHAV R DAHIPHALE
Date: 2022.04.04 17:23:21 +05'30'

**( उद्धव र. दहिफळे )**
शासनाचे उप सचिव

**प्रत :-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.मंत्री/राज्यमंत्री (जलसंपदा), महाराष्ट्र शासन,

५. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई ३२,
६. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
७. अपर मुख्य सचिव (जसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. सचिव (साविस), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.सचिव (लाक्षेवि)/सचिव (प्रकल्प समन्वयक), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
११.महासंचालक मेरी, जलसंपदा विभाग, नाशिक
१२.सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळे,जलसंपदा विभाग.
१३.सह सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४.सह सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय मुंबई.
१५.सर्व मुख्य अभियंता / अधिक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१६.उप सचिव (प्रशा) / (आस्था), जलसंपदा विभाग, मंत्रालय मुंबई.
१७.अवर सचिव सेवा/ सनि/ राकसे / आस्था, जलसंपदा विभाग, मंत्रालय मुंबई.
१८.कक्ष अधिकारी आ (मंत्रालय) / वर्ग-१ /संनि/ शा.अ./ स.अ.श्रेणी-२ / आ (तांत्रिक)/ आ (अतांत्रिक)
१९.आ (वर्ग-२) संर्गहार्थ.